**१३ व्या वित्त आयोगांतर्गतच्या'कोर्टमॅनेजर (Court Manager)' या घटकाखालील निधीतून राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्टमॅनेजर यांच्या करीता संगणक सामुग्री खरेदी करण्या करीता येणा-या रु.९६,८९,१९०/- इतक्या खर्चाच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- तेविआ-२०२१/प्र.क्र. ३१ (भाग-१)/कार्या.-सात**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : ०८ मार्च, २०२३

**संदर्भ** :-१) मा. प्रबंधक.मा. उच्च न्यायालय (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. F.& B. /१४ th F.C./७०/२०२०-२१,दिनांक १६.०२.२०२१.

२) मा. प्रबंधक. मा. उच्च न्यायालय (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. F.& B/१४ th F.C./५९/२०२१-२२,दिनांक २२.१०.२०२१.

३) दि.०९.११. २०२१रोजीघेण्यातआलेल्याउच्चस्तरीयसंनियत्रणसमितीच्या बैठकीचेइतिवृत्त.

४) विधि व न्याय विभाग समक्रमांकाचे शासन निर्णय दि.११.११.२०२३

५) मा. प्रबंधक. मा. उच्च न्यायालय (निरिक्षणे-१), अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Insp-I/३७/२०२३,दिनांक १६.०२.२०२३.

६) दि.२३.०२.२०२३रोजीघेण्यातआलेल्याउच्चस्तरीयसंनियत्रणसमितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

७) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकिर्ण २०२३/प्र.क्र.७/२३/कोषा.प्रशा.५ दि.०९.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालयाच्या संदर्भ क्र. १ व २ येथील पत्रांन्वये राज्यातीलन्यायालयांमध्येकार्यरतकोर्ट मॅनेजर यांच्याकरीता ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स, एमएस ऑफीस, प्रिंटर व एक्सटर्नल पोर्टेबल हार्ड डिस्क्स या ५ प्रकारच्या संगणक सामुग्री खरेदी करण्याकरीता येणारा रु.१,१२,७५,०२०/- इतका खर्च१३ व्यावित्तआयोगातील 'कोर्टमॅनेजर (Court Manager)' याघटका खालीलअखर्चित निधीतून भागविण्याबाबतचाप्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सनियंत्रण समितीच्यादि.०९.११.२०२१ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता, त्यास उच्चस्तरीय सनियंत्रण समितीने मान्यता दिली होती. त्यानुसार, संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये, राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्ट मॅनेजर यांच्याकरीता ऑल इन वन संगणक, लॅपटॉप्स, एमएस ऑफीस, प्रिंटर व एक्सटर्नल पोर्टेबल हार्ड डिस्क या ५ प्रकारच्या संगणक सामुग्री खरेदी करण्याकरीता येणा-या रु.१,१२,७५,०२०/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

आता, उपरोक्त संगणक सामुग्रींच्या किंमतीमध्ये वाढ झाली असल्याने, उपरोक्त सर्व सामुग्री मंजूर रकमेच्या मर्यादेत खरेदी करणे शक्य नसल्याचे मा. उच्च न्यायालयाने संदर्भक्र. ५ येथील पत्रान्वये कळविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या डेडीकेटेड सेल समितीच्या निर्देशानुसार, उच्च न्यायालय प्रशासनाने मंजूर संगणक सामुग्रींपैकी लॅपटॉप (Microsoft Office सह) व प्रिंटर च्या खरेदीसाठी GeM Portal वरुन निविदा प्रक्रिया राबविली असून, त्यानुसार लॅपटॉप (Microsoft Office सह) व प्रिंटरसाठी रु.९०,८९,१९०/- इतका खर्च येणार आहे. तसेच, एक्सटर्नल पोर्टेबल हार्ड डिस्क्स खरेदीकरीता रु. ६ लक्ष इतका खर्च अपेक्षित आहे.

त्यानुसार, दि.११.११.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार मंजूर संगणक सामुग्रीं पैकी ऑल ईन वन संगणक वगळून अन्य ४ प्रकारच्या मंजूर संगणक सामुग्री रु.९६,८९,१९०/- इतक्या किंमतीमध्ये खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये शासनास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सनियंत्रण समितीच्या दि.२३.०२.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता, त्यास उच्चस्तरीय सनियंत्रण समितीने मान्यता दिली आहे.तसेच, सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ७ येथील शासन परिपत्रकातील निर्बंधांमधून सूट देण्यास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे.त्यानुसार, सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील न्यायालयांमध्ये कार्यरत कोर्ट मॅनेजर यांच्याकरीता लॅपटॉप (एमएस ऑफीससह), प्रिंटर व एक्सटर्नल पोर्टेबल हार्ड डिस्क्स ही संगणक सामुग्री खरेदी करण्याकरीता येणा-या रु.९६,८९,१९०/- (अक्षरी रु. शहाण्णव लक्ष एकोणनव्वद हजार एकशे नव्वद फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास याद्वारे सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येतआहे.

२. १३ व्या वित्त आयोगांतर्गत अखर्चित निधीमधून खरेदी करावयाच्या संगणक सामुग्रीचा तपशील पुढीलप्रमाणेआहे :-

| Sr. No. | Hardware | Quantity | Total Cost |
|---|---|---|---|
| 1. | Laptop (inclusive of MS Office) | 45 | 72,98,595/- |
| 2. | Printer | 45 | 17,99,595/- |
| 3. | External Portable Hard Disk | 45 | 6,00,000/- |
| **Total** | | | **96,89,190/-** |

३. सदर प्रस्तावांतर्गत खरेदीउद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७रोजीच्या शासननिर्णयातील तरतुदीनुसार विहित कार्यपध्दतीचे पालन करुन करण्यातयावी.

४. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान, ८००, इतरखर्च (००) (०२) न्यायदानात अधिक सुधारणा करण्यासाठी १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार अनुदान (केंद्रीय सहाय्य) (२०१४ ०४५९)" या लेखाशिर्षातील "१७- संगणक खर्च"या उद्दिष्टाखाली संबंधित वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावे.

६. सदर शासन निर्णय दि.२३.०२.२०२३ रोजीच्या मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियत्रण समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२६७/२०२३/व्यय-५, दि.०३.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०८१७०७२१२८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येतआहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d4714 00fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892 E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.08 17:12:47 +05'30'

**( नितीन वि. जिवने )**

**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) मा. उपमुख्यमंत्री महोदय यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४) प्रबंधक (निरिक्षणे-१), उच्च न्यायालय, मुंबई,
५) प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), उच्च न्यायालय, मुंबई,
६) महालेखापाल -१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९) वित्त विभाग (व्यय-५/वित्त आयोग कक्ष/अर्थ-११),
१०) कार्यासन अधिकारी (कार्या. ९/२३/२४/२५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती-का.७.